मोटार वाहन विभागातील कार्यकारी अधिका-यांना पुरविलेल्या पिस्तुलांसाठी काडतुसे खरेदीस कार्योत्तर मंजूरी देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्र. एमव्हीडी ०५०२/प्र.क्र.१९/परि-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ९ जुलै, २००३

**वाचा:-** १) परिवहन उप आयुक्त (प्रशासन), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. संकीर्ण ४६१८/१६१८/पिस्त/दहा/७५१, दिनांक १६.१.२००२.

**शासन निर्णय:-** मोटार वाहन विभागातील कार्यकारी अधिका-यांना त्यांच्या सेवाकाळात कार्यरत असताना स्वसंरक्षणार्थ ८० पिस्तुल खरेदी करण्यात आली आहेत. पिस्तुल हाताळण्याचे व चालविण्याचे प्रशिक्षण घेण्यासाठी जिवंत काडतुसांची आवश्यकता होती यास्तव पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या मध्यवर्ती साठ्यातून रु.६३,२४०/- किंमतीची ५००० काडतुसे खरेदी करण्यात आली. सदरच्या खरेदीस कार्योत्तर मंजूरी देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.एफएनआर-१०६६/१२१९/४४/२६६०/ रोमन सात,दिनांक १६.२.१९६६ मधील परिच्छेद (३) मधील सूचनानुसार सदर प्रस्तावाची सविस्तर माहिती पुढीलप्रमाणे आहे:-

**प्रधान शिर्ष :-** "२०४१ - वाहनावरील कर"

**ज्या कालावधीत खर्च करण्यात आला तो कालावधी :-** सन २००१-२००२

**खर्चाचे स्वरुप:-** काडतुस खरेदी.

**मंजूरीची रक्कम :-** रु.६३,२४०/- (रु. त्रेसष्ट हजार दोनशे चाळीस फक्त)

**कोणत्या कारणामुळे पूर्वसंमती घेता येऊ शकली नाही :-** मोटार वाहन विभागाच्या परिवहन कार्यालयास दि.२२.१२.२००० रोजी पिस्तुल प्राप्त झाली आहेत. पिस्तुल चालविण्याचे प्रशिक्षण घेण्यासाठी प्रादेशिक परिवहन अधिकारी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रात येणा-या पोलीस कार्यालयात संपर्क साधला असता त्यांना पिस्तुलात जिवंत काडतुसाचा वापर केल्याशिवाय प्रशिक्षण पूर्णपणे देता येत नाही असे सांगण्यात आले. सदर पिस्तुल दि.२२.१२.२००० पासून विनावापर पडून राहिल्यामुळे वापरण्याजोगी करण्यासाठी सर्व्हीसिंग करावे लागले असते व त्यासाठी अतिरिक्त खर्च झाला असता. तसेच प्रशिक्षणात खंड पडू नये या कारणास्तव परिवहन आयुक्त यांनी पूर्वसंमती न घेता राज्य राखीव पोलीस बल,पुणे यांचेकडून ५००० जिवंत काडतुसे खरेदी केली.

<u>सार्वजनिक हिताच्या दृष्टीने खर्चाची बाब अपरिहार्य स्वरुपाची होती काय :-</u> होय.

<u>कार्योत्तर मंजुरी घेण्यासाठी तत्परतेने कार्यवाही करण्यात आली काय :-</u> होय

२. मोटार वाहन विभागाने ५००० काडतुसे खरेदीसाठी झालेल्या रु.६३,२४०/- (रु.त्रेसष्ट हजार दोनशे चाळीस फक्त) इतक्या खर्चास शासन कार्योत्तर मंजूर देत आहे. हा खर्च पुस्तकी समायोजनाने पारित करावयाचा आहे.

३. यावर होणारा खर्च "२०४१ वाहनावरील कर-००१ संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०१) परिवहन आयुक्त-०५-कार्यालयीन खर्च (योजनेतर) (२०४१००१८)" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २००३-२००४ मध्ये मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर- ७२०/२००३ /व्यय-८, दिनांक ३०.६.२००३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शा. र. नागवेकर)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१, पुणे,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई,
कार्यासन अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.